**आदिवासी विकास विभागांतर्गत निलंबित केलेल्या गट-अ व गट-ब मधील राजपत्रित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचा नियतकालिक आढावा घेण्याकरिता प्रशासकीय विभाग स्तरावर निलंबन आढावा समितीचे गठण.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१५/प्र.क्र. ७७ /का-१५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय,मुंबई-४०००३२

तारीख: १७/६/२०१५.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.निप्रआ-११११/प्र.क्र.८६/ ११-अ, दि.१४/१०/२०११.

२) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.अभियो-१३१२/प्र.क्र.३०/ पुर्नबांधीत-१, दि.१२/०२/२०१३.

३) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.अभियो-१३१४/प्र.क्र.८६/ ११-अ, दि.३१/०१/२०१५.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम,१९७९ च्या नियम ४, पोट नियम ५ (क) च्या परंतुकातील तरतुदीनुसार ज्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना बेहिशोबी मालमत्ता, नैतिक अध:पतन, लाचलुचपत, खुन, खुनाचा प्रयत्न, बलात्कार या व अशा गंभीर प्रकरणात फौजदारी गुन्हा दाखल झाल्यामुळे निलंबित करण्यात आले असेल अशा प्रकरणात निलंबनाचा नियतकालिक आढावा घेण्यासाठी संदर्भाधीन क्र. १ वरील शासन निर्णयान्वये गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांसाठी मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली आणि गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांसाठी संबधित विभागीय आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली निलंबन आढावा समित्यांचे गठन करण्यात आले आहे. अधिकाराचे प्रत्यायोजन करणे व निर्णयप्रक्रियेत सुलभता आणून निर्णय प्रक्रिया गतिमान करणे या शासनाच्या धोरणास अनुसरुन सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ वरील शासन निर्णयान्वये गट-अ व गट-ब संवर्गातील फौजदारी गुन्हादाखल असलेल्या व निलंबित असलेल्या अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्याकरिता मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील समितीऐवजी प्रशासकीय विभागाच्या स्तरावर निलंबन आढावा समिती गठीत करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने आदिवासी विकास विभागातील गट-अ व

गट-ब मधील राजपत्रित अधिकारी यांच्याबाबतीत प्रशासकीय विभाग स्तरावर निलंबन आढावा समितीचे गठन करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना बेहिशोबी मालमत्ता, नैतिक अध:पतन, लाचलुचपत, खुन, खुनाचा प्रयत्न, बलात्कार या व अशा गंभीर प्रकरणात फौजदारी गुन्हा दाखल झाल्यामुळे निलंबित करण्यात येते. अशा प्रकरणात आदिवासी विकास विभागांतर्गत गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा नियतकालिक आढावा घेण्यासाठी प्रशासकीय विभागाच्या स्तरावर पुढीलप्रमाणे 'निलंबन आढावा समिती' गठीत करण्यात येत आहे.

**गट-"अ व" गट-"ब" कर्मचाऱ्यांबाबत प्रशासकीय विभाग स्तरावरील निलंबन आढावा समिती**

| | | |
|---|---|---|
| १. सचिव (आदिवासी विकास विभाग) | : | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग | : | सदस्य |
| ३. उपसचिव/ सहसचिव (गृह विभाग) | : | सदस्य |
| ४. उपसचिव ( का-१५), आदिवासी विकास विभाग | : | सदस्य सचिव |

२. उक्त निलंबन आढावा समितीची सर्वसाधारण कार्ये ही पुढीलप्रमाणे राहतील:-

अ) संबंधित निलंबित अधिकारी यांच्याविरुध्द सक्षम न्यायालयात अभियोग चालविण्यास सक्षम प्राधिका-यांनी मंजूरी दिली असणे, संबंधित अधिका-यांविरुध्द विभागीय चौकशी सुरु केलेली असणे, तसेच संबंधितांचा निलंबन कालावधी १ वर्षाहून अधिक झालेला असणे, इ. संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयात नमुद निकष विचारात घेऊन, निलंबित अधिकाऱ्यांच्या प्रकरणांचा आढावा घेणे.

ब) संबंधित निलंबित कर्मचाऱ्याचे निलंबन चालू ठेवणे अथवा मागे घेणे याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करणे.

क) लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून प्राप्त झालेल्या व विभागाकडे ९० दिवसांपेक्षा जास्त कालावधीसाठी प्रलंबित असलेल्या अभियोग मंजुरीच्या प्रकरणांचा, निलंबित अथवा निलंबनाशिवाय पुन:स्थापना /नेमणूक करतांना अकार्यकारी पदावर नियुक्ती आहे किंवा कसे याची तपासणी करणे, लाचलुचपत/ फौजदारी प्रकरणात न्यायालयाने शिक्षा केलेल्या कर्मचाऱ्यावर कार्यवाही करणे याबाबींचा आढावा घेऊन संबधितांना जलद निपटारा करण्याबाबत कार्यवाही करण्याच्या सूचना देणे.

ड) गट-क व गट-ड मधील कर्मचाऱ्यांबाबत अभियोग दाखल करण्याच्या क्षेत्रीय स्तरावरील प्रलंबित प्रकरणांचा प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवडयात आढावा घेणे व त्यासंदर्भातील अहवाल मुख्य सचिव तसेच अपर मुख्य सचिव(गृह) यांना प्रत्येक महिन्यास सादर करणे.

३. उक्त सुधारणांव्यतिरिक्त शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १४/१०/२०११ व दिनांक १२/०२/२०१३ मधील अन्य तरतूदींमध्ये कोणताही बदल करण्यात आलेला नाही, त्या तरतूदी तशाच राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१४१४५८३६४८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Bapurao Gawade

Digitally signed by Prabhakar Bapurao Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prabhakar Bapurao Gawade
Date: 2015.07.14 15:00:35 +05'30'

**( प्रभाकर.बा. गावडे )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१ ) मा.मंत्री (आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव,

२) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव

३) मा.सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,

४) सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.

५) सामान्य प्रशासन विभाग (११-अ), मंत्रालय,मुंबई.

६) अतिरिक्त पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई.

७) सहसचिव/ उपसचिव ,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

९) आयुक्त, आदिवासी प्रशिक्षण व संशोधन संस्था,पुणे.

१०) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/अमरावती/नागपूर.

११) सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास.

१२) निवड नस्ती-१५